राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत HWC आरोग्यवर्धिनी केंद्र-उपकेंद्र यांचेकरीता समुदाय आरोग्य अधिकारी यांना सन २०२१-२२ प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) मधून Tablet खरेदी निविदा प्रक्रियेद्वारे करण्यास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.१९/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ०७ जानेवारी, २०२२.

**वाचा :-**

सहसंचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र. राआसो/HWC/Tablet खरेदी /८०८२४-८२५/२१, दिनांक १२.११.२०२१.

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत HWC आरोग्यवर्धिनी केंद्र-उपकेंद्र यांचेकरीता समुदाय आरोग्य अधिकारी यांना माहिती व तंत्रज्ञान सुविधा (IT Service and Strengthening) अंतर्गत सन २०२१-२२ प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) FMR Code ६.१.२.५.१ अंतर्गत एकूण रु.१७१.७३ लक्ष इतके अनुदान मंजूर करण्यात आले आहे. त्यांस अनुसरुन उपरोक्त संदर्भाधीन प्रस्तावाच्या अनुषंगाने १३२१ समुदाय विकास अधिकारी यांना उपलब्ध निधीमधून ई-निविदा प्रक्रिया राबवून टॅबलेट खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आरोग्य सेवा आयुक्तालयाने प्रस्तावित केल्यानुसार आयुष्यमान भारत कार्यक्रमांतर्गत HWC आरोग्यवर्धिनी केंद्र-उपकेंद्रामधील कार्यरत समुदाय आरोग्य अधिकारी यांना आवश्यक असलेले टॅबलेट सन २०२१-२२ च्या मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) मध्ये FMR Code ६.१.२.५.१ (IT equipment for HWCs) अंतर्गत प्राप्त अनुदानातून एकूण- १३२१ टॅबलेट ई-निविदा प्रक्रिया राबवून खरेदी करण्यासाठी प्रति टॅबलेट रु.१३०००/- प्रमाणे एकूण रु.१७१.७३ लक्ष ( रुपये एकशे एकाहत्तर लक्ष त्र्याहत्तर हजार फक्त) इतक्या रकमेस पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

०२. सदरची प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

1. सदर टॅबलेटची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू टॅबलेटचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) तसेच राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत HWC आरोग्यवर्धिनी केंद्र-उपकेंद्र यांचेकरीता समुदाय आरोग्य अधिकारी यांना सन २०२१-२२ च्या मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) मध्ये FMR Code ६.१.२.५.१ (IT equipment for HWCs) अनुसार मंजूर निधीतून Tablet करण्यासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला

उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी - २०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै,२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०३. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई, संचालक (आरोग्य सेवा), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई, सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०७१३३७३३२२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.01.07 14:28:18 +05'30'

**( वि. ल. लहाने)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) अतिरिक्त संचालक (आरोग्य सेवा), राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
५) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.

७) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९) निवडनस्ती (आरोग्य-७)